**विटा मर्चंट को. ऑपरेटिव्ह बँक, लि. विटा (सांगली) या बँकेच्या विशेष एकरकमी कर्ज परतफेड योजनेस मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: युआरबी-१८२१/प्र.क्र.१४७/७-स,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक :- ०९ फेब्रुवारी, २०२२.

वाचा :- १) शासन निर्णय समक्रमांक दि. १९ मार्च, २०२१.
२) शासन निर्णय समक्रमांक दि. १२ ऑगस्ट, २०२१

**प्रस्तावना :-**

दि विटा मर्चंन्ट को. ऑपरेटिव्ह बँक, लि. विटा (सांगली) या बँकेस “विशेष एकरकमी कर्ज परतफेड योजना” मंजूर करण्याबाबत सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी दि. १६.०३.२०२१ रोजी शासनास प्रस्ताव सादर केला होता. त्यानुसार शासनाने संदर्भ क्र.१ मधील शासन निर्णयाद्वारे या बँकेस दिनांक ३०.०६.२०२१ पर्यंत विशेष एकरकमी कर्ज परतफेड योजना मंजूर केली होती. तसेच संदर्भ क्र. २ मधील शासन निर्णयाद्वारे सदर योजनेस दिनांक ३१.१२.२०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

या मुदतवाढीच्या कालावधीत सुमारे रु. २.५१ कोटी एवढ्या कर्ज रक्कमेची वसूली झाली आहे. त्यानुषंगाने सदर योजनेस मुदतवाढ मिळाल्यास बँकेचा संचित तोटा कमी होऊन बँकेस वाढीव तरलता उपलब्ध होईल. सबब, बँकेचे हित लक्षात घेऊन सदर योजनेस मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी दि. ३१.०१.२०२२ रोजीच्या पत्राद्वारे दि विटा मर्चंन्ट को. ऑपरेटिव्ह बँक, लि. विटा (सांगली) या बँकेसंदर्भात सादर केलेल्या विशेष एकरकमी कर्ज परतफेड योजनेस मुदतवाढ देण्याच्या प्रस्तावास महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० चे कलम १५७ मधील तरतूदीनुसार शासनास प्राप्त असलेल्या अधिकारानुसार महाराष्ट्र सहकारी संस्था नियम, १९६१ मधील नियम-४९ च्या तरतुदीमधून सूट देऊन दि विटा मर्चंन्ट को. ऑपरेटिव्ह बँक, लि. विटा (सांगली) या बँकेस परिशिष्ट “अ ” मध्ये नमूद विशेष एकरकमी कर्ज परतफेड योजनेस दिनांक ३०.०४.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

वरील योजनेच्या अंमलबजावणीचा सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांनी दरमहा आढावा घेऊन भारतीय रिझर्व्ह बँकेच्या अटींचे दि विटा मर्चन्ट को. ऑपरेटिव्ह बँक, लि. विटा (सांगली) बँकेकडून काटेकोरपणे पालन होत असल्याची खात्री करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२०९१७१२२४४२०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shinde Rahul Chandrashekhar

Digitally signed by Shinde Rahul Chandrashekhar
DN: CN = Shinde Rahul Chandrashekhar, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT
Date: 2022.02.09 17:14:08 +05'30'

**( राहूल शिंदे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत** :-

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, कोल्हापूर.
३) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था, सांगली.
४) अध्यक्ष, दि विटा मर्चन्ट को. ऑपरेटिव्ह बँक, लि. विटा (सांगली)

## परिशिष्ट "अ"

शासन निर्णय क्र. युआरबी-१८२१/प्र.क्र.१४७/७-स, दिनांक ०९ फेब्रुवारी, २०२२ सोबतचे सहपत्र

## विशेष एक रकमी कर्ज परतफेड योजना

**पात्रता व नियमः-**

अ) अनुत्पादीत कर्जाच्या वर्गवारीमध्ये समाविष्ट होणारी सर्व कर्ज खाती सवलतीस पात्र राहतील. तथापि कर्जदार Willful-Defaultor नसावा.

ब) यामध्ये तारणी व विनातारणी या दोन्ही कर्जाचा समावेश आहे.

क) यामध्ये वैयक्तिक, एच.यु.एफ., प्रोप्रायरटरशीप, पार्टनरशीप, कंपनी इ. सर्व प्रकारच्या संस्था(Institutions) कर्जदारांचा समावेश असेल.

ड) न्यायप्रविष्ट तसेच वसुली निवाडा प्राप्त असलेले सर्व एनपीए खात्यांचा यामध्ये समावेश असेल.

इ) सरफेसी कायदा व निगोशिएबल इन्स्ट्रुमेंट ॲक्ट कायद्यातील कलम १३८ खाली कारवाई चालू असलेल्या एनपीए खात्यांचा यामध्ये समावेश असेल.

ई) बँकेकडील कर्जाचे संबंधीत कर्ज खाते कर्जदार किंवा जामीनदार एकाचवेळी पूर्णपणे बंद करत असल्याससदर योजनचा लाभ संबंधीत कर्जदार/ जामीनदार यांना घेता येईल.

उ) कर्जदार अथवा त्याचे जामीनदार यांना बँकेचे नियम व अटीस अधीन राहून स्वेच्छेने सहभाग घेता येईल. त्यांचे विनंती अर्जानुसार सदरचे सवलत योजनेचा अवलंब करता येईल.

ऊ) कर्जदाराने / जामीनदाराने त्याचे अर्जासोबत तडजोड रकमेच्या २५% रक्कम भरणा करणे आवश्यक असून उर्वरीत ७५% रक्कम तडजोडी मंजूरीचे दिनांकापासून ३० दिवसाचे आत बँकेकडे जमा करणे आवश्यक आहे. सदर ३० दिवसाचे मुदतीत उर्वरीत रक्कम बँकेकडे जा न झालेस संबंधीत कर्जदार/ जामीनदार यांना या सवलत योजनेचा कोणताही लाभ दिला जाणार नाही.तसेच अर्जासोबत भरणा केलेली २५% रक्कम संबंधीत कर्जदाराचे मुद्दल येणे खाती जमा केली जाईल. सदर ३० दिवसांच्या मुदतीसाठी उर्वरीत रक्कमेस तडजोड दिनांकापासून संपूर्ण रक्कम फिटेपर्यंत उर्वरीत रक्कमेवर द.सा.द.शे. १२% प्रमाणे व्याजाची आकारणी केली जाईल.

Shinde Rahul Chandrashekhar

Digitally signed by Shinde Rahul Chandrashekhar
DN: CN = Shinde Rahul Chandrashekhar, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT
Date: 2022.02.09 17:14:26 +05'30'

**(राहूल शिंदे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**